**महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) या संवर्गातील शिक्षणाधिकारी व तत्सम या पदावरील ३ अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-पकास-२४१७/प्र.क्र.३०५/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - ०४ डिसेंबर, २०१९

<u>वाचा</u> :- १. शा.शि. व क्री.वि., शा.नि. क्र. संकीर्ण-३९०४/प्र.क्र.१०३/१३/प्रशा-२, दिनांक १३.०६.२०१३
२. शा.शि. व क्री.वि.,शा.नि. क्र. ससेप्र-४३०२/प्र.क्र.७०/१३/प्रशा-२, दिनांक ०८.०८.२०१३.
३. शा.शि. व क्री.वि.,शा.नि. क्र. एसएटी-३८१४/प्र.क्र.२१२/प्रशा-२, दिनांक ०६.०१.२०१६.
४. आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र. आस्था-अ/टे.क्र.१०६/परि.काला/गट-अ/२०१७/ ४६८४, दिनांक ०६.१०.२०१७.
५. आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र.आस्था-अ/टे.क्र.१०६/परि.काला/गट-अ/२०१८/५११० दिनांक २४.०९.२०१८
६. आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र. आस्था-अ/टे.क्र.१०६/परि.काला/गट-अ/२०१९/ १६९, दिनांक ०८.०१.२०१९.
७. मा. न्यायाधिकरण प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे मूळ अर्ज क्र. ९२५/२०१७ मधील दिनांक ५.९.२०१९ रोजीचे आदेश

**<u>प्रस्तावना</u>:-**

उपरोक्त वाचा येथे नमूद अ. क्र.१ येथील दिनांक १३.०६.२०१३ च्या शासन निर्णयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) गट-अ संवर्गात शिक्षणाधिकारी व तत्सम या पदावर दिनांक ०१.०७.२०१३ पासून नियुक्ती देऊन पायाभूत प्रशिक्षण देण्याचा निर्णय घेण्यात आला होता. प्रशिक्षण पूर्ण केलेल्या अधिकाऱ्यांना दिनांक ०८.०८.२०१३ च्या शासन निर्णयान्वये शिक्षणाधिकारी व तत्सम पदावर पदस्थापना दिली आहे. त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची शिक्षणाधिकारी व तत्सम पदावर २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली आहे.

२. महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) गट-अ मधील शिक्षणाधिकारी व तत्सम या पदावर नियुक्त करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त (शिक्षण) यांनी दिनांक ०६.१०.२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. पायाभूत

प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण करणाऱ्या व शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परिविक्षाधीन कालावधीच्या अटींची पूर्तता करणाऱ्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय** :

शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परिविक्षाधीन कालावधीच्या अटींची पूर्तता करणाऱ्या, उपरोक्त वाचा येथे नमूद अ.क्र.१ येथील दिनांक १३.०६.२०१३ च्या शासन निणयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) गट-अ संवर्गात शिक्षणाधिकारी व तत्सम या पदावर कार्यरत सोबतच्या प्रपत्रामध्ये नमूद अधिकाऱ्यांचा त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ७ मध्ये नमूद दिनांकास परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यात येत असून रकाना क्रमांक ८ मध्ये नमूद दिनांकास त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. परिविक्षाधीन पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांना वार्षिक वेतनवाढी देण्यात याव्यात. तसेच संबंधितांच्या सेवापुस्तकात याची नोंद घेण्यात यावी.

३. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र. ९२५/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून सोबतच्या तत्क्त्यात नमूद केलेल्या ३ अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी संपुष्टात आणण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९१२०४१५०८४९४६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: CN = DEEPAK VIJAY SHELAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = NA
Date: 2019.12.04 15:12:15 +05'30'

**( दीपक शेलार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
३) सर्व शिक्षण संचालक
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७) संबंधित अधिकारी ( आयुक्त शिक्षण यांचे कार्यालया मार्फत)
८) निवडनस्ती

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक पकास-२४१७/प्र.क्र.३०५ /प्रशा-२, दिनांक ४ डिसेंबर, २०१९ सोबतचे प्रपत्र

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | शासन सेवेत नियुक्तीच्या आदेशाचा दिनांक | शासन सेवेत प्रथम रुजू झाल्याचा दिनांक | रकाना ४ मधील दिनांकानुसार परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेल्या एकूण अर्जित/परिवर्तीत रजा इ. एकूण कालावधी | रकाना ६ मधील कारणांमुळे वाढलेला परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक पूर्ण केल्यामुळे शासन सेवा ज्या दिनांकापासून पुढे चालु ठेवावयाची आहे तो दिनांक. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री. भगवान श्रीधरराव सोनवणे | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र.संकिर्ण-३९०४/ प्र.क्र.१०३/१३/प्रशा-२, दिनांक १३.०६.२०१३. | ०१.०७.२०१३ | ३०.०६.२०१५ | ११६ | २५.११.२०१५ | २६.११.२०१५ |
| २ | श्री. किरण अनंत लोहार | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र.संकिर्ण-३९०४/ प्र.क्र.१०३/१३/प्रशा-२, दिनांक १३.०६.२०१३ | ०१.०७.२०१३ | ३०.०६.२०१५ | -- | १३.०८.२०१५ | १४.०८.२०१५ |
| ३ | श्री. प्रविण वसंत अहिरे | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र.संकिर्ण-३९०४/ प्र.क्र.१०३/१३/प्रशा-२, दिनांक १३.०६.२०१३ | ०१.०७.२०१३ | ३०.०६.२०१५ | २५४ | ११.०४.२०१६ | १२.०४.२०१६ |

DEEPAK VIJAY SHELAR
Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: CN = DEEPAK VIJAY SHELAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = NA
Date: 2019.12.04 15:12:31 +05'30'

(दीपक शेलार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन